अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा कार्यालयांतर्गत कार्यरत असलेले श्री.सत्यवान अरविंद चव्हाण, वाहन चालक यांच्या अधिसंख्य पदास मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२१/प्र.क्र.७६/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १३ जून, २०२३

**संदर्भ** : १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९, दि.२७ नोव्हेंबर, २०२० व दि.२८ ऑक्टोबर, २०२१.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२०.
३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्र.ईएसटी-२०२१/प्र.क्र.३१/प्रशासन-१, दि.२६ एप्रिल, २०२१.
४) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.१४ ऑक्टोबर, २०२१.
५) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र.बीसीसी २०१९/प्र.क्र.५८१ ए/१६-ब,दि.१४/१२/२०२२
६) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा यांचे दि.०४ मे, २०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि. २१ डिसेंबर, २०१९ मधील तरतुदीनुसार, अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणाऱ्या अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत निर्देश देण्यात आले आहेत. तद्नंतर सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४ डिसेंबर, २०२० अन्वये सदर अधिसंख्य पदे निर्माण करण्याचे प्राधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा अंतर्गत कार्यरत असलेले श्री.सत्यवान अरविंद चव्हाण, वाहन चालक यांच्याकरीता सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, दि.२६ एप्रिल, २०२१ अन्वये अधिसंख्य पद निर्माण करण्यात आले असून, सदर अधिसंख्य पदास दि.०४ मे, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. श्री.सत्यवान चव्हाण यांच्या अधिसंख्य पदास देण्यात आलेली मुदत संपुष्टात आल्याने त्यांना एक दिवसाचा तांत्रिक खंड देऊन दि.०६ मे, २०२३ पासून पुढे मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४ डिसेंबर, २०२२ अन्वये श्री.सत्यवान अरविंद चव्हाण, वाहन चालक, यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास दि.०६ मे, २०२३ पासून दि.०५ एप्रिल, २०२४ पर्यंत किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. श्री.सत्यवान चव्हाण, वाहन चालक हे सद्य:स्थितीत अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असल्याने त्यांच्या वेतनावर होणारा खर्च त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधिच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**३.** सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. बीसीसी २०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९ व क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२० रोजीच्या तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. बीसीसी २०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२७ नोव्हेंबर, २०२०, दि.१४ डिसेंबर, २०२२ आणि सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.ईएसटी २०२१/प्र.क्र.३१/ प्रशासन-१, दि.२६ एप्रिल, २०२१ या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०६१३११४८५९१८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO

Digitally signed by SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=1fbca76d11ad25e383a0e28da215f01e12183c1b565ddd29aaf1ffbfad8e9e9c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6F385E4139AB144CAAF92B440B55068479C3789EA50EC85EB7A16B7C932CB397, cn=SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO
Date: 2023.06.13 11:49:38 +05'30'

**( विक्रमसिंह. प्र. शिंदे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-** १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा.

**प्रत :-** १) अपर मुख्य सचिव (सा.बां.) / सचिव (रस्ते) / सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
४) महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी , पुणे / सातारा.
६) कार्यासन सेवा-३ / सेवा-४ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती कार्यासन प्रशासन-१.